**शक्ती प्रदान समितीने शिफारस केलेली नक्षलग्रस्त भागातील विविध विकास कामे तातडीने होण्यासाठी नवीन स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक एनएएक्स ०९१५/प्र.क्र.२८९/विशा-१ब,**
दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० जानेवारी, २०१७.

वाचा : (१) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक एनएएक्स १११२/प्र.क्र.४४४/विशा-१ब, दिनांक २६.०८.२०१४.
(२) पोलीस महासंचालक कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/२१ अ/१९५/शक्ती प्रदान समिती/४४/२०१३, दिनांक ११.०७.२०१६.

**प्रस्तावना :-**

नक्षलग्रस्त भागातील विविध विकास कामे करण्यासाठी शक्ती प्रदान समिती व मंत्रीमंडळ उपसमिती दिनांक २६.०८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली असून सदर समितीला उपलब्ध करुन देण्यात येणा-या निधीसाठी स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नक्षलग्रस्त भागातील विविध विकास कामे करण्यासाठी शक्ती प्रदान समिती व मंत्रीमंडळ उपसमिती दिनांक २६.०८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली असून सदर समितीने उपलब्ध करुन देण्यात येणा-या निधीसाठी अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नावे स्वीय प्रपंजी लेखा खाते सुरु करण्यास महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ च्या नियम ४९५ मध्ये नमूद नियमांच्या तसेच खालील अटींच्या अधीन शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) स्वीय प्रपंजी लेख्याबाबत तपशीलवार लेखे ठेवणे, विहित नियतकालिक विवरणे महालेखापाल यांना सादर करण्याची जबाबदारी संबंधित स्वीय प्रपंजी लेखा खाते धारकाची राहील. तसेच सदर स्वीय प्रपंजी खात्याचे लेखा परिक्षण करणे आवश्यक राहील.

आ) सदर स्वीय प्रपंजी खात्यासाठी अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील व सदरचे खाते योग्यरित्या हाताळण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

इ) या खात्यात फक्त शासनाकडून शक्ती प्रदान समितीस प्राप्त होणारी रक्कमच जमा करण्यात यावी.

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १६२/१६/कोषा प्र. ५, दिनांक १६.०९.२०१६ तसेच महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई यांचे क्र. ख.वि/चा-१/गृह विभाग/यूओआर-१०९/PLA/२०१६-१७/१५४७, दिनांक ०२.१२.२०१६ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१२०१६१४१८६४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay D Patil

Digitally signed by Vijay D Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5254aa09c72b0eb445f264826ab10bb42793fc26e3838113296e7ff812051f6f, cn=Vijay D Patil
Date: 2017.01.20 16:16:39 +05'30'

**( विजय पाटील )**
**उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
३) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) अवर सचिव, वित्त विभाग (व्यय ७) / कोषा प्र. ५, मंत्रालय, मुंबई,
७) अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) अपर मुख्य सचिव (गृह) / प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) निवड नस्ती/ विशा १ ब.